# मेरी सिकोल

लेखिका: हॅरियेट कॅस्टर

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



# मेरी सिकोल

सुमारे दोनशे वर्षांपूर्वी, *मेरी* नावाची एक लहान मुलगी वेस्ट इंडीजच्या *जमैका* बेटांवर राहात होती. तिची आई एक वसतीगृह चालवत असे. तिथे घरगुती प्रकारची खाणावळ होती. तिथे लोक दीर्घकाळ राहू शकत असत. मेरी नेहमी आईला कामात मदत करत असे.



मेरी आणि तिची आई जमैकातील सर्वात मोठे शहर *किंग्स्टन*मध्ये राहात.

उत्तर अमेरिका

अटलांटिक महासागर

मेक्सिको

मेक्सिकोची खाडी

कॅरिबियन समुद्र

प्रशांत महासागर

कोलंबिया

ब्राझिल

CUBA

जमैका

HAITI

KINGSTON

दक्षिण अमेरिका

ब्रिटन तिथून हजारो मैल दूर असूनही त्याकाळात जमैकावर इंग्रजांची सत्ता होती. बेटावरील बहुतेक कृष्णवर्णीय लोक गुलाम होते. गुलाम नसलेल्या, मेरी आणि तिच्या आईसारख्या कृष्णवर्णीय लोकांना डॉक्टर, वकील असे व्यवसाय करण्याचे स्वातंत्र्य नव्हते.






लवकरच, मेरीनेही मोठे होऊन डॉक्टर बनायचे, असे ठरवले. तिने आपल्या आईला जवळून पाहिले होते आणि तिच्याकडून शक्य तितके शिकून घेतले होते. तिने आपल्या बाहुलीवर डॉक्टरकीचा अभ्यास सुरू केला.




मेरीची आई मात्र नियम डावलून डॉक्टरी काम करत असे. तिने डॉक्टरीची अधिकृत परीक्षा दिली नव्हती, पण तिने जमैकातील जुन्याजाणत्या डॉक्टरांकडून अनेक कौशल्ये शिकून घेतली होती. ती आपली औषधेसुद्धा स्वतःच बनवत असे.

मेरीची आणखी एक महत्त्वाकांक्षा होती: प्रवास. ती नेहमी नकाशे पाहून कुठे कुठे जायचे, या स्वप्नांत दंग असे.




किशोर वयात मेरी आपल्या काही नातलगांसोबत ब्रिटनला आली.

तिला तिच्या वर्णावरून तेथील मुले चिडवत असत. तरीही तिला लंडन खूप आवडले.




नंतर मेरीने बहामा, हैती आणि क्यूबा अशा सर्व कॅरेबियन बेटांचा दौरा केला.

1836 मध्ये, वयाच्या एकतीसाव्या वर्षी, मेरीने लग्न केले. तिच्या पतीचे नाव *एडविन सिकोल* होते. एडविनची तब्येत बरी नसे. तो आजारी पडला की मेरी त्याची देखभाल करत असे.

काही काळाने, एडविनचा मृत्यू झाला आणि मेरीच्या आईचाही मृत्यू झाला. मेरी वसतीगृह सांभाळू लागली. तिचे घर आगीत जळाले. या सर्व प्रतिकूल परिस्थितीतही, तिने कणखर राहायचा प्रयत्न केला.



एव्हाना मेरी एक चांगली डॉक्टर बनली होती. पण तिला अधिकाधिक शिकण्याची भूक होती. जेव्हा कधी लष्कराचे, नौदलाचे सर्जन तिच्या घरी राहात, तेव्हा ती त्यांना बऱ्याच शंका विचारत असे.





तिला पुन्हा प्रवास करण्याची इच्छा झाली. तिचा भाऊ *पनामा* देशात राहात होता. मेरीने पनामाला जायचे ठरवले. तो देश कसा आहे, हे तिला पाहायचे होते.

त्याकाळी पनामा हे एक धोकादायक ठिकाण होते. अनेक प्रवासी तिथून प्रवास करत.




मेरीचा भाऊ तिथे प्रवाशांसाठी एक हॉटेल चालवत होता. हॉटेल म्हणजे एक खाणावळच होती. मेरी तिथे पोहोचली तेव्हा तिला झोपायला तिथे जास्तीचा बिछानाही नव्हता.

पहिल्या रात्री ती आणि तिची मोलकरीण टेबलखाली झोपले. तिचा भाऊ आणि त्याचा नोकर टेबलवर झोपले.

तुझ्या रक्षणासाठी आम्ही इथेच झोपतो, मेरी.

उगाच आले इथे!




लवकरच तिथे मेरीच्या कौशल्याची गरज पडू लागली. शहरात डॉक्टर नव्हता. प्राणघातक कॉलरा पसरू लागला, तेव्हा फक्त मेरीलाच त्याच्या उपचारांचे ज्ञान होते. सर्वजण तिच्याकडे मदतीसाठी आणि औषधपाण्यासाठी येऊ लागले.

रोग वेगाने पसरू लागला. मेरी अहोरात्र काम करू लागली. त्यातच ती स्वतःही आजारी पडली. सुदैवाने, ती त्यातून लवकर बरी झाली.

लवकर बऱ्या व्हा,
मिसेसे सिकोल. आम्हाला
तुमची गरज आहे. !

शहर कॉलऱ्यापासून मुक्त झाल्यावर, मेरीने आपली स्वत:ची खाणावळ सुरू करून उदरनिर्वाह चालवायचा निर्णय घेतला. तिला एक पडझड झालेली झोपडी भाड्याने मिळाली. तिने ती झोपडी छानपैकी सजवली आणि एकाचवेळी पन्नास लोकांसाठी जेवण बनवले. तिने त्याला *ब्रिटीश हॉटेल* असे नाव दिले.



ब्रिटीश हॉटेलचा चांगलाच जम बसला, पण मेरीने पनामा सोडण्याचा आणि जमैकाला परतण्याचा निर्णय घेतला.

ती जमैकाला परतली तेव्हा तिथे पीतज्वराची साथ पसरली होती. लवकरच, मेरीचे वसतीगृह रोग्यांनी भरून गेले. मेरीला जवळच्या एका सैन्य शिबिरातही रुग्णांची देखभाल करण्याची विनंती करण्यात आली.

पीतज्वराचा जोर कमी होताच मेरी पुन्हा प्रवासाला निघाली. कित्येक महिने ती दक्षिण अमेरिकेतील *एस्क्रीबॅनोस* नावाच्या जागी राहिली. तिथे एक सोन्याची खाण होती.



मग 1854 साली, वयाच्या एकोणचाळीसाव्या वर्षी, मेरीने पुन्हा लंडनचा प्रवास केला.

त्या वर्षी ब्रिटन आणि फ्रान्सने मिळून रशियाविरुद्ध युद्ध पुकारले. काळ्या समुद्राच्या किनाऱ्यावरील *क्रिमिया* नावाच्या क्षेत्रात हे युद्ध झाले.

तेथील सैन्य शिबिरात कॉलरासारखे आजार ही एक भयानक मोठी समस्या होती.
युद्धापेक्षा जास्त सैनिक या रोगांनी मरत होते.



प्रसिद्ध परिचारिका (नर्स) *फ्लोरेन्स नाइटिंगेल* या ओंगळ आणि अस्वच्छ हॉस्पीटल सुधारण्यासाठी अगोदरच क्रिमियाला पोहोचल्या होत्या. पण तिथे आणखीही नर्सची गरज होती. मेरीने तिथे स्वयंसेवक बनून जाण्याचा निर्णय घेतला.





मेरी आतुरतेने आपल्या मुलाखतीची वाट पाहू लागली. पण तिला बोलावणे आले नाही. शेवटी तिला सांगण्यात आले की तिची गरज नाही. मेरीला वाटले की ती कृष्णवर्णीय असल्यामुळे तिला नाकारले असावे.






मेरीने हार मानली नाही. तिच्याकडे फक्त जहाजाच्या तिकिटाचा खर्च भागवण्याइतपत पैसे होते. तरीही तिने जाण्याचा निर्णय घेतला. तिला आशा होती की तिथे पोहोचल्यावर तिला उदरनिर्वाहाचा काही ना काही मार्ग सापडेलच.




मेरीने क्रिमियाला जाण्यासाठी स्वत:च पैसे जमवायचा प्रयत्न केला. पण कुणीही तिला मदत केली नाही.

तो एक दीर्घ प्रवास होता. शेवटी मेरी *बालाक्लावा* नावाच्या ठिकाणी पोहोचली. एक मित्र, *थॉमस डे* सोबत तिने सैनिकांसाठी एक दुकान आणि खाणावळ सुरू करायचे ठरवले.

सुरुवातीला मेरीला राहाण्यासाठी कुठेच जागा मिळाली नाही. ती लष्करी जहाजावर झोपू लागली आणि किनाऱ्यावर जखमी सैनिकांची देखभाल करण्यात मदत करू लागली.






मेरी आणि थॉमस यांना आपले दुकान बांधायचे होते. पण त्यासाठी लागणारे सामान मिळवणे खूप कठीण होते. त्यांनी अगदी बंदरात पडलेले भंगार सामानही वापरले. शेवटी एकदाचे, दुकान बांधून झाले.

लवकरच सैनिकांमध्ये आणि स्थानिक लोकांमध्ये त्यांची खाणावळ खूप लोकप्रिय झाली. सैनिकांसाठी होणारा अन्नपुरवठा खूप कमी होता. इतरही काही खाणावळी होत्या. पण तेथील जेवण महाग असे. मेरीकडे मिळणारे जेवण स्वस्त आणि पौष्टीक होते.



जेवणाबरोबरच मेरीच्या दुकानात चपला, टोपी, मोजे आणि काठी या वस्तुही मिळत. तिथे चोरी ही एक मोठी समस्या होती. एकदा मेरीला जाणवले की तिच्या चाळीस बकऱ्या आणि मेंढ्या गायब झाल्या होत्या.

बालाक्लावामधील जीवन धोकादायक होते. मेरीची धोबीण जवळच राहात असे. एकदा रात्री, धोबीण आणि तिच्या कुटुंबियांची हत्या करण्यात आली. मेरी नेहमी भयभीत होत असे., म्हणून थॉमसने तिला एक बंदूक दिली.



दुकानात खूप काम असे. अर्थात, मेरीला भान असे की आपले मुख्य काम, आजाऱ्यांना मदत करणे, हे आहे.

तिने रणांगणांवर जाऊन जखमी आणि मृत्युच्या दारात असलेल्या सैनिकांना शोधून काढले, आजुबाजुला बंदुकीच्या गोळ्यांचा वर्षाव होत असताना.

सैनिक कुठल्याही सैन्याचा का असेना, मेरीने त्याला शक्य तेवढी मदत केली. या कामासाठी मेरीला कुणी पैसे दिले नव्हते.

रोज सकाळी मेरीच्या झोपडीत सैनिकांची गर्दी होत असे. ते तिच्याकडे औषध घेण्यास येत असत.



मेरी जखमी सैनिकांना त्यांच्या झोपडीत भेटायला जात असे. ती त्यांच्यासाठी खाण्या-पिण्याचे जिन्नस नेत असे. तिला याचे पैसे नेहमीच मिळत नसत. मेरी एवढे काम करत असे की तिला बऱ्याचदा जेवणासाठी आणि झोपण्यासाठीही वेळ उरत नसे.

वरिष्ठ पदावरील अधिकाऱ्यांपासून साध्या सैनिकांपर्यंत सगळ्यांना मदर सिकोलविषयी जिव्हाळा वाटू लागला.



1856 साली यद्ध समाप्त झाले. मेरीला आनंद झाला, पण चिंताही वाटू लागली. तिने आणि थॉमसने आपल्या दुकानासाठी खूप वस्तू खरेदी करून ठेवल्या होत्या. आता त्यांचा काही उपयोग नव्हता. त्या वस्तू त्यांना खूप कमी किंमतीत विकाव्या लागल्या. काही वस्तू तर कुणीच विकत घेतल्या नाहीत.

मेरी ब्रिटनला निघाली. परतल्यावर तिथे राहायला तिला घर नव्हते, जवळ पैसा नव्हता.






लंडनमध्ये मेरीने राहायला एक जागा शोधली आणि तिथे आपल्या आयुष्यावर एक पुस्तक लिहायला सुरुवात केली. त्याचं नाव होतं *मिसेस सिकोलच्या आयुष्यातील विलक्षण साहसे*. 1857 साली पुस्तक प्रकाशित झाले. हे पुस्तक थोड्याच काळात सर्वाधिक खपाचे पुस्तक बनले.

आजवर मेरीने क्रिमियात ज्या सैनिकांना मदत केली होती, त्यांतील काहींना कळले की मेरीकडे पैशाचा अभाव होता. मेरीच्या उपकाराची परतफेड म्हणून त्यांना तिला मदत करावीशी वाटली.

जुलै 1857 मध्ये, मेरीसाठी निधी जमवायला लंडनच्या एका संगीत सभागृहात एक सोहळा आयोजीत करण्यात आला.

या सोहळ्यात चार सादरीकरणे झाली. कार्यक्रमाची सगळी तिकिटे विकली गेली. मेरी तिथे पोहोचली तेव्हा जमावाने तिचा जयजयकार केला.

पण ज्या कंपनीने सोहळ्याचे आयोजन केले ती दिवाळखोरीत गेली आणि शेवटी मेरीला फार कमी पैसे मिळाले.



क्रिमियन युद्धकाळात मेरीची तब्येत ढासळू लागली होती, पण तरीही तिने काम करणे चालूच ठेवले. तिची मित्रमंडळी अजूनही तिच्यासाठी निधी गोळा करण्यावर ठाम होते.






शेवटी मेरीकडे दोन घरे – एक लंडनमध्ये आणि दुसरे जमैकामध्ये - बाळगण्याइतपत पैसा जमला. तिने आपले उर्वरित आयुष्य याच दोन ठिकाणी घालवले. तिला भेटायला अनेक पाहुणे मंडळी येत असत. तिने जीव वाचवलेले अनेक सैनिकही या पाहुण्यांमध्ये असत.



# पुढील घटना

## जमैका

*जमैका* हे कॅरेबियन समूहातील एक बेट आहे. 1494 पर्यंत, युरोपातील लोकांना त्याची काही माहिती नव्हती. मग *ख्रिस्तोफर कोलंबसने* त्याचा शोध लावला. त्यानंतर, स्पेनने जमैकावर सत्ता गाजवली. 1655 मध्ये, जमैका ब्रिटनने जिंकून घेतले. जमैका हे व्यापारी, गुलामांचे व्यापारी आणि सागरी चाच्यांसाठी एक महत्त्वाचे केंद्र बनले. 1833 साली, तिथे गुलामगिरी प्रथा बंद करण्यात आली, पण ब्रिटनने 1962 पर्यंत, जमैकावर राज्य केले.

## गुलामांचा व्यापार

गुलाम व्हायचे म्हणजे, त्याचा कुणीतरी मालक असणार. गुलामाला स्वत:चे कुठलेच हक्क नव्हते. त्याला कोणतेही सामान खरेदी करायची परवानगी नव्हती. त्याला आपले संपूर्ण आयुष्य मालकाच्या सेवेसाठी वाहून घ्यावे लागत असे.

कित्येक वर्षे ब्रिटीश व्यापाऱ्यांनी गुलाम विकून भरपूर पैसा कमावला. त्यांनी पश्चिम आफ्रिकेतील लोकांना बळजबरीने पकडून कॅरेबियन बेटांवर नेऊन विकले.



## प्रसिद्ध फ्लोरेन्स नाइटिंगेल

*फ्लोरेन्स नाइटिंगेल* आणि *मेरी सिकोल* या दोघींनी क्रिमियन युद्धात महत्त्वाची कामगिरी बजावली आणि अनेक सैनिकांचा जीव वाचवला.



युद्ध समाप्तीनंतर, ब्रिटनमध्ये फ्लोरेन्स मेरीच्या तुलनेत जास्त प्रसिद्ध झाली. कदाचित फ्लोरेन्स गौरवर्णीय होती, एका श्रीमंत इंग्रज कुटुंबातून आली होती म्हणून असे झाले असावे. यामुळेच, मेरी सिकोलचे नाव खूप कमी लोकांना परिचित असते.

# मेरी सिकोलच्या आयुष्यातील काही महत्त्वपूर्ण तारखा

1805 मेरी जेन ग्रँटचा जन्म जमैकाची राजधानी किंग्स्टनमध्ये झाला.

तिची आई एक मुक्त कृष्णवर्णीय स्त्री होती आणि तिचे वडील स्कॉटीश सैन्यात अधिकारी होते.

1836 मेरीने एडविन होरेशियो सिकोलशी लग्न केले. काही काळाने एडविनचा मृत्यू झाला.

1850 जमैकात कॉलराचा प्रकोप झाला. मेरीने रुग्णांच्या उपचाराविषयी बरेच ज्ञान मिळवले.

1853 मेरी पनामावरून जमैकात परतली. तिथे पीतज्वराची साथ पसरली होती.

1854 ब्रिटन आणि फ्रान्सने रशियाविरुद्ध युद्ध पुकारले. याला “क्रिमियन युद्ध” म्हणून ओळखतात.

1854 फ्लोरेन्स नाइटिंगेल यांनी नर्सचा एक गट क्रिमियाला नेला.

मेरीला स्वयंसेवक म्हणून काम करण्यास परवानगी नाकरण्यात आली.

1855 मेरी क्रिमियाला निघाली. तिथे तिने बालाक्लावा येथील हॉस्पीटलमध्ये मदत केली. तिने तिथे एक दुकान आणि खाणावळही चालवली.

1856 क्रिमिया युद्ध समाप्त झाले. मेरी इंग्लंडला परतली.

1857 मेरीसाठी निधी जमवण्याकरीता लंडनमध्ये एक भव्य लष्करी सोहळा आयोजीत केला गेला.

1857 मेरीचे पुस्तक *मिसेस सिकोलच्या आयुष्यातील विलक्षण साहसे* प्रकाशित झाले. पुस्तक खूप लोकप्रिय झाले.

1881 मेरी सिकोलचे निधन झाले. तिचे दफन लंडनमध्ये करण्यात आले.